**शासन सेवेत असताना दूरशिक्षणाद्वारे किंवा अंशकालीन पद्धतीने स्थापत्य अभियांत्रिकी पदविका धारण केलेल्या जलसंपदा विभागातील स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांची दि.०१.०१.२०१४ रोजीची (दि.३१.१२.२०१३ अखेरची) अंतरिम (तात्पुरती) ज्येष्ठतासूची.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक:- ज्येष्ठता १२१४/(प्र.क्र. ९६/२०१४)/आ (तांत्रिक)**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-३२

तारीख:-१९.११.२०१४

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक जलसंपदा विभाग क्र: ज्येष्ठता ११११/ (प्र.क्र.३७३/२०११)/ आ(तांत्रिक), दि.११.०५.२०१२

२) शासन परिपत्रक जलसंपदा विभाग क्र: ज्येष्ठता १११३/ (प्र.क्र.७१/२०१३)/ आ(तांत्रिक), दि.०५.१२.२०१३.

३) शासनपत्र समक्रमांक दि.१०/३/२०१४, दि. ५/५/२०१४, दि. ३१/५/२०१४ व दि. २२/८/२०१४.

४) अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, औरंगाबाद व परिमंडळीय अधिकारी, औरंगाबाद परिमंडळ यांचे क्र. दपपमं/आस्थापना-५/५४३, दि. १९/५/२०१४ रोजीचे पत्र.

५) अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, ठाणे व परिमंडळीय अधिकारी, मुंबई परिमंडळ यांचे क्र. दप/पमं/मेज-३/२३/सन २०१४, दि. ३/२/२०१४ रोजीचे पत्र.

**शासन परिपत्रक:-**

जलसंपदा विभागात स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावर कार्यरत असताना दूरशिक्षणाद्वारे किंवा अंशकालीन पद्धतीने स्थापत्य अभियांत्रिकी पदविका धारण केलेल्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांची दि. १.१.२०१३ रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आली आहे. त्यानंतर आता परिमंडळीय अधिका-यांकडून प्राप्त माहितीच्या आधारे दि. १.१.२०१३ ते दि.३१.१२.२०१३ या कालावधीत दूरशिक्षणाद्वारे किंवा अंशकालीन पद्धतीने स्थापत्य अभियांत्रिकी पदविका धारण केलेल्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांची नावे अंतर्भुत करून या संवर्गातील कर्मचा-यांची दि. ०१.०१.२०१४ रोजीची (दि. ०१.०१.२०१३ ते दि. ३१.१२.२०१३ या कालावधीची ) अंतरिम (तात्पुरती) ज्येष्ठतासूची या परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्ठाप्रमाणे प्रसिध्द करण्यात येत आहे.

२. सर्व परिमंडळीय अधिकारी यांना कळविण्यात येते की, ही अंतरिम(तात्पुरती) ज्येष्ठतासूची सर्व संबंधित स्थापत्य अभियांत्रिकी सहायक यांच्या तात्काळ निदर्शनास आणावी.

३. सदर ज्येष्ठतासूची मध्ये काही चुका/ त्रुटी आढळून आल्यास किंवा काही आक्षेप असल्यास त्याबाबत दि.१५.१२.२०१४ पर्यंत शासनाकडे योग्य मार्गाने तसेच आवश्यक त्या कागदपत्रांच्या साक्षांकित प्रतीसह लेखी स्वरूपात कळवावे. विहित वेळेत व विहित मार्गाने प्राप्त न झालेले आक्षेप विचारात घेण्यात येणार नाहीत, याची कृपया नोंद घ्यावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१४१११९१४४०११९०२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mandar Rameshchandra Karnik

Digitally signed by Mandar Rameshchandra Karnik
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mandar Rameshchandra Karnik
Date: 2014.11.19 15:07:02 +05'30'

( मं. र. कर्णिक )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-** १. अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, ठाणे व परिमंडळीय अधिकारी, मुंबई परिमंडळ.

२. अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, औरंगाबाद व परिमंडळीय अधिकारी, औरंगाबाद परिमंडळ.

३. अधीक्षक अभियंता, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे व परिमंडळीय अधिकारी, पुणे परिमंडळ.

४. अधीक्षक अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (दरवाजे) मंडळ, नाशिक व परिमंडळीय अधिकारी, नाशिक परिमंडळ.

५. अधीक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा व परिमंडळीय अधिकारी, कोल्हापूर परिमंडळ

६. अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, नागपूर व परिमंडळीय अधिकारी, नागपूर परिमंडळ.

७. अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, अमरावती व परिमंडळीय अधिकारी, अमरावती परिमंडळ.

प्रत:- आ(तांत्रिक) संग्रहार्थ

## परिशिष्ट

शासन सेवेत असताना अंशकालिन किंवा दूरशिक्षणाव्दारे स्थापत्य अभियांत्रिकी पदविका उत्तीर्ण केलेल्या जलसंपदा विभागातील स्थापत्य अभियांत्रिकी सहायकांची दि. ०१/०१/२०१३ ते दि.३१-१२-२०१३ या कालावधीची अंतरिम जेष्ठता सूची (शासन परिपत्रक क्र.जेष्ठता-शासन परिपत्रक क्र. १२१४/ प्र.क्र.९६ /२०१४/ आ(तांत्रिक) दि. १९/११/२०१४चे सहपत्र )

| अ.क्र. | कर्मचा-याचे नांव | जात प्रवर्ग नियुकतीनंतर जात प्रवर्ग बदलला असल्यास त्याचा दिनांक | जन्मदिनांक | स्था.अ.स. पदावर ज्या संवर्गात आले ते पद | आस्थापना | नियुकतीचा दिनांक | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावर समावेशनाचा दिनांक | स्थापत्य अभियांत्रिकी पदविका उत्तीर्ण केल्याचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | परिमंडळ | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २४२ | टोणपे मच्छिंद्र रोहिदास | अ.जाती | ०१.०६.१९६८ | - | - | - | १२.०९.२००३ | १९.०७.२०१३ | ३१.०५.२०२६ | ठाणे | भुकंप पुनर्वसन कार्यक्रमात नियुक्ती देण्यात आलेल्या कर्मचा-यांमधून थेट नियुक्ती |